**कोषागारातून रोख देय अनुदान**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) अंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिश्श्याचे सर्वसाधारण घटकासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत...

**(लेखाशीर्ष २२१५ ९८३५)**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०१८/प्र.क्र.४६४/पापु-१६**

७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०७ फेब्रुवारी,२०१९.

<u>वाचा</u> -

1) **केंद्र शासनाचे मंजूरी आदेश क्र.: एस-१२०११/७/२०१५-एसबीएम,दि.२५/०७/२०१८.**
2) **वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल,२०१८**
3) **शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०१८/प्र.क्र.४६४/पापु-१६, दि. १४ ऑगस्ट ,२०१८.**

<u>प्रस्तावना</u> -

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) च्या केंद्र हिश्यासाठी २२१५ ९८३५ या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता रु. २८१६६०.६५ लक्ष इतका नियतव्यय मंजुर करण्यात आला असून तो पूर्णपणे अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. सदर रु. २८१६६०.६५ लक्ष निधी वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करून दिलेला आहे. उक्त वाचा १ येथील केंद्र शासनाच्या मंजूरी आदेशान्वये रू.८७४००.६७ लक्ष ( आठशे चौऱ्याहत्तर कोटी सदुसष्ट हजार फक्त) इतके अनुदान स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) च्या केंद्र हिश्श्याच्या सर्वसाधारण घटकासाठी राज्यास प्राप्त झालेले आहे. सदर रू.८७४००.६७ लक्ष निधीमधून उपरोक्त वाचा ३ येथील शासन निर्णयानुसार रू.७१६२९.१३लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आलेला असून रू.१५७७१.५४लक्ष इतका निधी शिल्लक आहे. सदर शिल्लक रू.१५७७१.५४लक्ष वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) साठी केंद्र हिश्श्याच्या अनुदानांतर्गत सर्वसाधारण घटकासाठी (Normal allocation) रू.८७४००.६७ लक्ष निधी

वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर रू.८७४००.६७ लक्ष निधीमधून वाचा ३ येथील शासन निर्णयान्वये रू.७१६२९.१३ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आलेला असून रू.१५७७१.५४लक्ष इतका शिल्लक आहे. सदर शिल्लक रू.१५७७१.५३७ लक्ष निधीमधून रू.७७४६.००लक्ष इतका निधी वार्षिक कृती आराखडा २०१८-१९ नुसार Sanitary Complexes बांधकामाकरिता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील स्तंभ क्र.५ नुसार अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे रोख स्वरूपात मुक्त करण्यात येत आहे. उर्वरीत रू.८०२५.५४लक्ष (रू.१५७७१.५४ लक्ष- रू.७७४६.००लक्ष)इतका निधी संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे अधिनस्त ठेवण्यात येत आहे.

०२. "राज्यस्तरावर संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे अधिनस्त ठेवण्यात आलेली रू.८०२५.५४ लक्ष इतकी रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कम रू.८०२५.५३७ लक्ष (रूपये ऐंशी कोटी पंचवीस लक्ष चौपन्न हजार फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२) (श्री. एल.ए. जाधव),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (श्री.अभय महाजन), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२) (श्री. एल.ए. जाधव),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी रू.८०२५.५४ लक्ष इतकी रक्कम अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करून स्वतंत्र धनादेशान्वये संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे."

३. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान ज्या करणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावे. संबंधित जिल्हा परिषदा/संस्था यांनी या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा.

आ) संबंधित जिल्हा परिषदेने/संस्थेने या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

इ) अट क्र.३-अ आणि ३-आ यांची पुर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी, महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२, नागपूर यांच्याकडे जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

ई) सदर रक्कम केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील तरतूदींनुसार तसेच या संदर्भात राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे/ आदेशाप्रमाणे खर्च करण्यात यावी.

उ) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहित नमून्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास पाठविण्याची दक्षता घ्यावी. शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील पापु-०४, पापु-१६ व पापु-२० या कार्यासनांस सादर करावा.

ऊ) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी निधी वितरण, खर्च याबाबतची नोंद केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर (IMIS) घेण्याची दक्षता घ्यावी.

ऋ) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करून आवश्यक बाबींची पुर्तता करून कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरीत सादर करावीत.

ऌ) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करावे.

४. हा खर्च "मागणी क्रमांक वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ जलनि:स्सारण व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा, (०२) ग्रामसफाई कार्यक्रम, (०२) (१०) निर्मल भारत अभियान केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत शौचालय बांधणे (सर्वसाधारण घटक) (केंद्र हिस्सा) (२२१५ ९८३५), ३१ सहायक अनुदाने(वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली खर्चीत करण्यात यावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल,२०१८ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील मधील तसेच परिशिष्टातील अ.क्र.८ मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तींची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे. उपरोक्त रू.८७४००.६७ लक्ष एवढा केंद्र निधी राज्याच्या एकत्रीत निधीत जमा झाल्याबाबतची खात्री वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून करण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०७११५७२३७३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Sachin Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, serialNumber=4b9befd340493837db4cffafa6b96eeaf6aa3c12a7a6bf0467b0f517b724e8ee, cn=Smita Sachin Rane
Date: 2019.02.07 14:24:54 +05'30'

(स्मि.स.राणे)

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता)
३. विभागीय आयुक्त, सर्व.
४. उपायुक्त विकास, सर्व विभागीय आयुक्त यांचे कार्यालय.
५. उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती सर्व.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
९. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.
१०.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, (WSSO), बेलापूर, नवी मुंबई.
११.उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पा.व स्व.), जिल्हा परिषद, सर्व.
१२.उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, जिल्हा परिषद, सर्व.
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१४.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१५.नियोजन विभाग, (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुंबई.
१६.वित्त विभाग, (व्यय-३) मंत्रालय, मुंबई.
१७.आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२)
१८. कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती, कार्यासन पापु-१६.

विवरणपत्र

**सन २०१८-१९ करिता केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) अंतर्गत Sanitary Complexes करिता निधी वितरण (लेखाशिर्ष २२१५ ९८३५).**

शासन निर्णय क्र.स्वभामि-२०१८/प्र.क्र.४६४/पापु-१६, दि. ०७ फेब्रुवारी, २०१९ सोबतचे सहपत्र.

(रू.लाखांत)

| अ.क्र. | जिल्हा /संस्थेचे नाव | यापूर्वी वितरीत निधी (दिनांक १४ ऑगस्ट, २०१८ च्या शासन निर्णयान्वये ) | Sanitary Complexes संख्या | Sanitary Complexes करिता निधी वितरण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | वासो | १६७४.८३ | ---- | ---- |
| २ | अहमदनगर | १११३.७६ | ७१८ | **८६१.६** |
| ३ | अकोला | ७९७.१९ | ११० | **१३२.०** |
| ४ | अमरावती | १२१४.९० | ५५ | **६६.०** |
| ५ | औरंगाबाद | ६६३९.४७ | ९० | **१०८.०** |
| ६ | बीड | ५३२८.३२ | २१८ | **२६१.६** |
| ७ | भंडारा | १०३.४७ | ८२ | **९८.४** |
| ८ | बुलढाणा | ५०५३.९९ | ६५३ | **७८३.६** |
| ९ | चंद्रपूर | १६८.९७ | १६० | **१९२.०** |
| १० | धुळे | २९६०.०९ | १० | **१२.०** |
| ११ | गडचिरोली | ५२२.८० | १२१ | **१४५.२** |
| १२ | गोंदिया | १११.६७ | ७४१ | **८८९.२** |
| १३ | हिंगोली | १८६८.८१ | ६५ | **७८.०** |
| १४ | जालना | १०९१.९५ | ५०० | **६००.०** |
| १५ | जळगाव | ६०२९.८५ | २७५ | **३३०.०** |
| १६ | कोल्हापूर | १०२४.४३ | ० | **०.०** |
| १७ | लातुर | १३८८.०४ | १०० | **१२०.०** |
| १८ | नागपूर | ४३०.५२ | ६२ | **७४.४** |
| १९ | नांदेड | ६४३६.२३ | ३० | **३६.०** |
| २० | नंदुरबार | ४९४.९५ | ३० | **३६.०** |
| २१ | नाशिक | २७३३.३९ | १०५ | **१२६.०** |
| २२ | उस्मानाबाद | ४२६३.३३ | १३० | **१५६.०** |

| अ.क्र. | जिल्हा /संस्थेचे नाव | यापूर्वी वितरीत निधी (दिनांक १४ ऑगस्ट, २०१८ च्या शासन निर्णयान्वये) | Sanitary Complexes संख्या | Sanitary Complexes करिता निधी वितरण |
|---|---|---|---|---|
| २३ | पालघर | १११.६७ | ८० | **९६.०** |
| २४ | परभणी | ७१७०.९० | १७८ | **२१३.६** |
| २५ | पुणे | ४३७.२६ | १२४ | **१४८.८** |
| २६ | रायगड | १२६८.१९ | १०० | **१२०.०** |
| २७ | रत्नागिरी | ११९.८७ | १३५ | **१६२.०** |
| २८ | सांगली | १२८.०७ | ५० | **६०.०** |
| २९ | सातारा | ७३५.७९ | १२० | **१४४.०** |
| ३० | सिंधुदुर्ग | १११.६७ | ३० | **३६.०** |
| ३१ | सोलापूर | ६५६०.७९ | २०० | **२४०.०** |
| ३२ | ठाणे | ९०.७५ | २१ | **२५.२** |
| ३३ | वर्धा | १११.७० | ६०१ | **७२१.२** |
| ३४ | वाशिम | ४२९.४० | १२० | **१४४.०** |
| ३५ | यवतमाळ | २९०२.११ | ४४१ | **५२९.२** |
| एकूण | ३५ | **७१६२९.१३** | **६४५५** | **७७४६.०** |
| अक्षरी रूपये | | **रूपये सातशे सोळा कोटी एकोणतीस लक्ष तेरा हजार फक्त** | | **रूपये सत्त्याहात्तर कोटी सेहचाळीस लक्ष फक्त** |

Smita Sachin Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, serialNumber=4b9befd340493837db4cffafa6b96eeaf6aa3c12a7a6bf0467b0f517b724e8ee, cn=Smita Sachin Rane
Date: 2019.02.07 14:25:39 +05'30'

(स्मि.स.राणे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.